**वैध मापन शास्त्र यंत्रणेतील १७५ अस्थायी पदांना दि. १ मार्च, २०२४ ते दि. ३१ ऑगस्ट, २०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. :-वैमाशा-२०२२ /प्र.क्र. १०३/ ग्रासं-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १० एप्रिल, २०२४

**वाचा**:- १) शासन निर्णय क्र -वैमाशा-२०२२ /प्र.क्र. १०३/ग्रासं-३ दिनांक १७/०९/२०२३,
२) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०१७/प्र.क्र.१५६/ना.पु.१२, दि. १८ /०४/२०२२
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.दि.२१ फेब्रुवारी, २०२४
४) नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांचे पत्र क्र.पदनि (१५) -११२३ / प्र.क्र.१/वैमाशा-१/ २६४, दि. ०७/०३/२०२४

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील दिनांक १८ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयान्वये अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाचा सुधारित आकृतीबंधामध्ये वैध मापन शास्त्र यंत्रणेतील पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयान्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेसाठी एकूण ६६१ पदांना मंजूरी देण्यात आली असून उर्वरित वाहनचालक/वाहनचालक(जड)/क्रेनचालक/ शिपाई/नाईक/हमाल या संवर्गाची एकूण २८३ पदे मृत घोषीत केली आहेत.

२. उपरोक्त १ येथील शासन निर्णयान्वये नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मुंबई आणि जिल्हा स्तरावरील आस्थापनेवर असलेल्या पदांपैकी १७५ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२३ ते दिनांक २९/०२/२०२४ (सहा महिने) या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भिय क्र.३ अन्वये अस्थायी पदांना दि.१ मार्च, २०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आलेले आहे. सबब, संदर्भ क्र.४ च्या अनुषंगाने यासंदर्भात शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांच्या यंत्रणेसाठी निर्माण करण्यात आलेल्या गट-अ ते गट-क मधील विविध संवर्गातून एकूण १३२ अस्थायी पदे व गट-क व गट-ड संवर्गात मृत घोषित केलेल्या २८३ पदांपैकी कार्यरत असलेल्या एकूण ४३ अस्थायी पदे (१३२+४३= १७५) असे एकूण १७५ अस्थायी पदांना या शासन निर्णयासोबत जोडलेल्या "विवरणपत्र-अ" मध्ये दर्शविलेल्या एकूण १७५ अस्थायी पदांना सद्यस्थितीत दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/०८/२०२४ (सहा महिने) पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक, एम-३, मुख्य लेखाशीर्ष ३४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा (१०६), वजन व मापे यांचे विनियमन (००) (०१) वजने व मापे विनियमन, (३४७५००९३)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२४ - २०२५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०४१०१८१३४४८५०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.04.10 18:26:22 +05'30'

**( राजश्री रा. सारंग )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र-वरीलप्रमाणे**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञयेता ), मुंबई / नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
६) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सर्व सह नियंत्रक, वैधमापन शास्त्र, पुणे, नागपुर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, कोकण, मुंबई महानगर विभाग, ( नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे मार्फत )
८) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई ( ३ प्रती )
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) सर्व उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र. (नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे मार्फत )
११) निवडनस्ती (ग्रासं-३ )

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक -वैमाशा-२०२२/ प्र. क्र. १०३/ ग्रासं-३ दि. १० एप्रिल, २०२४ अन्वये दि. १ मार्च, २०२४ ते दि. ३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत ( मुदतवाढ )पुढे चालू ठेवण्यात आलेली अस्थायी पदे.

| **अ.क्र** | **पदनाम** | **पदे** |
|---|---|---|
| १ | सह नियंत्रक वैधमापन शास्त्र | २ |
| २ | उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र | ९ |
| ३ | स्वीय सहायक | १ |
| ४ | अधिक्षक | २ |
| ५ | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र | १४ |
| ६ | निरीक्षक, वैधमापन शास्त्र | ४२ |
| ७ | वरिष्ठ लिपीक | २ |
| ८ | लिपीक-टंकलेखक | १३ |
| ९ | प्रयोगशाळा सहायक | २ |
| १० | क्षेत्र सहायक | ४५ |
| ११ | वाहन चालक ( मृत संवर्गातील शिपाई पदावर कार्यरत असलेली अस्थायी पदे) | ५ |
| १२ | शिपाई (मृत संवर्गातील शिपाई पदावर कार्यरत असलेली अस्थायी पदे) | ३८ |
| | **एकूण** | **१७५** |

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.04.10 18:26:01 +05'30'

**( राजश्री रा. सारंग )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**